राष्ट्रीय आरोग्य अभियान_सन २०२२-२३ व २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता पीआयपी अंतर्गत राष्ट्रीय कर्णबधिरता व नियंत्रण कार्यक्रमासाठी मंजुर केलेल्या अनुदानातुन विविध उपकरणे निविदा प्रक्रियेद्वारे खरेदी करण्यास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२३/प्र.क्र.११६/आरोग्य-७**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२५.

वाचा :-

(१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-१२२३/प्र.क्र.११६/आरोग्य-७, दिनांक २४/०३/२०२३.

(२) सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/NCD/NPPCD/उपकरणे खरेदी/ सुधारित प्रशासकीय मान्यता/१४०१-१४८३/ २०२४, दिनांक २२/११/२०२४.

प्रस्तावना:-

राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणा-या राष्ट्रीय कर्णबधिरता प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम राज्यात ३४ जिल्हयात राबविण्यात येत आहे. जिल्हयात बहिरेपणाने पीडीत असलेल्या सर्व वयोगटातील नवजात बालके व व्यक्तींची तपासणीकरिता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार उपकरणे खरेदी करावयाची आहेत. सदर उपकरणे खरेदी करण्यासाठी सन २०२२-२३ व २०२३-२४ च्या मंजुर प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये रु.५०८.०० लक्ष इतका निधी मंजुर केलेला आहे. सदर मंजूर निधीतुन राष्ट्रीय कर्णबधिरता प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रमासाठी आवश्यक उपकरणे खरेदी करण्यासाठी संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. तथापि, सदर प्रशासकीय मान्यतेचा कालावधी संपुष्टात आल्याने प्रस्तुत प्रकरणी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणा-या राष्ट्रीय कर्णबधिरता प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम राज्यात ३४ जिल्हयात राबविण्यात येत आहे. जिल्हयात बहिरेपणाने पीडीत असलेल्या सर्व वयोगटातील नवजात बालके व व्यक्तींची तपासणीकरिता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार उपकरणे खरेदी करावयाची आहेत. सदर उपकरणे खरेदी करण्यासाठी सन २०२२-२३ व

२०२३-२४ च्या मंजुर प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये रु.५०८.०० लक्ष इतका निधी मंजुर केलेला आहे. त्या अनुषंगाने दिनांक २४/०३/२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. सदर प्रशासकीय मान्यतेचा कालावधी संपुष्टात आल्याने या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

( रुपये लक्षात)

| | २०२२-२३ व २०२३-२४ | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र | उपकरणाचे नाव | नग | अंदाजित किंमत | एकूण किंमत | मंजूर निधी |
| १ | ENT operating Microscope | २२ | ३.९ | ८५.८ | ५०८.०० |
| २ | Two Set of Micro drill with Head Pieces and Burr Head Hole | २४ | ०.०५ | १.२ | |
| ३ | Two sets of Micro ear surgery instrument | २६ | ०.०५ | १.३ | |
| ४ | Puretone Audiometer | २२ | ०.५ | ११ | |
| ५ | Impedance Audiometer | २२ | २.५ | ५५ | |
| ६ | Otacaustic Emission Analyzer (OAE) | ११८ | ३.०० | ३५४ | |
| एकुण | | | | ५०८.३ | |

**अटी व शर्ती :-**

१) सदर औषधे व औषधे साहित्ये सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबीच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू औषधे व औषधे साहित्ये सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांची तांत्रिक समिती / अधिकारी यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले खातरजमा करण्यात यावी, पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबीच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबीचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क. भांखस-२०१५/प्र.क्र.८२/भाग उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत, त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार, National Pharmaceutical Pricing Authority NPPA). National Medical Devices Authority (NDMA) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या न्युनतम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनतम दर निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी, औषधी साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे. त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/ Post-dispatch random sample Inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत NPPCD योजनेकरीता प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) द्वारे सन २०२२-२३ व २०२३-२४ या दोन या आर्थिक वर्षांसाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर बाबींकरीता पुरवठा आदेश देण्यापूर्वी निधीची उपलब्धताही तपासून घेण्यात यावी.

८) तसेच या बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र. समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्वता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी २०१६/प्र.क. २४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

१२) प्रस्तावित करण्यात आलेल्या औषधे व औषधी साहित्यांची खरेदी पुढील दोन आर्थिक वर्षाकरीता म्हणजेच सन २०२२-२३ व २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यात येणार असल्याने बाबनिहाय संख्येची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

१३) बाबनिहाय निविदा पूर्ण झाल्याबाबत आरोग्य सेवा आयुक्तालयास कळविण्यात यावे, जेणेकरुन त्या-त्या वेळी संबंधित बाबीचा साठा व प्रत्यक्ष आवश्यकता विचारात घेऊन वितरण यादी देता येईल. तसेच दोन वर्षात किमान ४ टप्प्यात खरेदी आदेश देण्यात येतील व याबाबत निविदेत अट टाकणे आवश्यक राहील.

०२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १३ येथे नमुद अटींची पुतर्ता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त, (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहिल.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२५१५४१०६४९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2025.02.25 15:41:50 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले )**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक १ व २, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई
५) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
६) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
७) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
८) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
९) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
१०) निवडनस्ती (आरोग्य-७)